**केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियान**
**भिवंडी-निजामपूर शहराच्या पाणी पुरवठा प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अमृत-२०१७/प्र.क्र.२७/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ०८ फेब्रुवारी, २०१७

**वाचा:** १. शासन निर्णय नगर विकास विभाग क्र: अमृत २०१५/प्र. क्र.१९७/नवि३३, दिनांक १३ ऑक्टोबर, २०१५.
२. अमृत अभियानांतर्गत गठीत राज्यस्तरीय उच्चाधिकार समितीच्या दिनांक २१/०१/२०१७ रोजी पार पडलेल्या बैठकीचे इतिवृत्त
३. शासन परिपत्रक क्र. नगर विकास विभाग क्र: अमृत२०१६/प्र.क्र.१६३/नवि-३३, दिनांक १६ मे, २०१६.

**प्रस्तावना:**

केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानाची अंमलबजावणी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये राज्यामध्ये सन २०१६-१७ वर्षापासून राज्यामध्ये करण्यात येत आहे. सदर अभियानांतर्गत पाणीपुरवठा,मलनिस्सारण, पर्जन्यजलवाहिनी, नागरी परिवहन व हरित क्षेत्र विकास इ. पायाभूत सुविधांची निर्मिती अभियान शहरांमध्ये करण्यात येणार आहे. त्यानुसार सदर अभियानांतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षामध्ये राज्याच्या रु. २४८९.९१ कोटी किंमतीच्या आराखडयास केंद्र शासनाने मान्यता दिलेली असून सदर आराखडयामध्ये भिवंडी-निजामपूरशहराच्या पाणीपुरवठा प्रकल्पाचा समावेश आहे.

०२. अमृत अभियानांतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाच्या आराखडयामध्ये समाविष्ट असलेल्या पाणीपुरवठा प्रकल्पाचा सविस्तर प्रकल्प अहवालास अमृत अभियानांतर्गत गठीत करण्यात आलेल्या राज्यस्तरीय तांत्रिक समितीने व तदनंतर राज्यस्तरीय उच्चाधिकार समितीने मान्यता दिलेली आहे. त्यानुसार राज्यस्तरीय उच्चाधिकार समितीने केलेली शिफारस व शासनाच्या मान्यतेच्या अनुषंगाने अमृत अभियानाच्या सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाच्या राज्य वार्षिक कृति आराखडयामध्ये समाविष्ट असलेल्या भिवंडी-निजामपूर शहराच्या पाणीपुरवठा प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-:**

केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानांतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षामध्ये केंद्र शासनाकडून मंजूर केलेल्या राज्य वार्षिक कृति आराखडयामध्ये समाविष्ट असलेल्या भिवंडी-निजामपूर शहराच्या पाणी पुरवठा प्रकल्पास संदर्भाधीन शासन निर्णयातील अटी व

तरतुदीच्या अधीन राहून खालील परिच्छेद क्र. २ मधील विवरणपत्रात नमूद केल्यानुसार या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

२. भिवंडी-निजामपूर शहर पाणी पुरवठा प्रकल्पातील उपांगे व त्यांचे किंमतीचे विवरण पुढीलप्रमाणे आहे:-

| Sr. No. | Name of Work | Amount Rs. |
|---|---|---|
| | **ZONE-I- Pipe Source- 100 MLD** | |
| 1 | Working Survey | 10,00,000.00 |
| 2 | Head Work- Jack well, overhead Pump house. | 4,07,73,963.30 |
| 3 | Construction of Retaining wall at Pipe Head Works | 1,03,68,277.50 |
| 4 | Construction of Sub Station at Pipe Head works. | 52,70,527.50 |
| 5 | Bhasta river crossing at Pise Head Works for 1321 mm dia O.D.RWRM | 5,75,45,915.70 |
| 6 | Construction of RCC Bride at Chain age 1600 to 1750 Mtr. On Nalla for Water Rising Main at Pise Head Works. | 83,44,170.45 |
| 7 | Construction of RCC Bride at PT 23 AT Gayatri Nagar for crossing BMMC Pipe lines. | 91,60,074.00 |
| 8 | Providing, lowering, laying and jointing 1300 mm dia (I.D.) M.S. Pipe line for Raw Water Rising Main at Head Works Pipe to W.T.P. at sonale Head Works 15 km. | 65,43,21,071.25 |
| 9 | Raw Water Pumping Machinery at Head Work pies. | 4,87,68,011.25 |
| 10 | Construction of W.T.P. Cap. 100 MLD at Sonale Village. | 17,29,70,032.20 |
| 11 | Recirculation of Water at W.T.P. Sonale Cap. 100 MLD | 1,49,82,226.35 |
| 12 | Providing installing and commissioning pure water pumping machinery at water Treatment Plant. | 4,10,04,688.20 |
| 13 | Providing, lowering, laying & jointing 1200 mm dia (I.D.) MS Pipe line for pure water Rising Main from WTP to MBR at sonale | 1,07,58,595.05 |
| 14 | Construction of RCC ESR (M.B.R.) 2 Nos. X 3.2 ML each in W.T.P. Campus at Sonale Village. | 6,28,59,480.60 |
| 15 | Providing, lowering, laying and jointing 1000 to 150 mm dia D.I. K-7 Pipe line for Zonal leading main in City pise Source | 1,45,157,496.75 |
| 16 | Construction of RCC Sump for Azad Nagar and Gayatri Nagar Cap. 4,50,000 Litters. | 35,00,217.00 |
| 17 | Construction of RCC ESR at shanti Nagar south (Babla Compound) -2 Nos. Cap. 1.35 ML each at nagaon-1 No. 1.8 ML Capacity. | 2,96,50,960.50 |
| 18 | Construction of RCC ESR Near Jain Mandir, Ashok Nagar (IGM) Capacity 1.00 ML | 94,16,994.36 |
| 19 | Providing Installing and Commissioning pure water pumping machinery at Azadnagar, Gayatrinagar. | 59,43,840.00 |
| 20 | Construction of overhead pump house for azadnagar, gayatrinagar | 7,11,238.50 |
| 21 | Providing, Lowering, laying and jointing 400mm D.I. K-9 pipe line for rising main (Pure Water) from sump to Azadnagar, Gayatrinagar GSR | 1,17,25,573.65 |
| 22 | Construction of RCC GSR at Azadnagar Gayatrinagar Cap 2.10ML | 85,51,917.15 |
| 23 | Construction of RCC GSR at Gayatrinagar Cap 1.10 ML | 58,24,421.10 |

| | | |
|---|---|---|
| 24 | Construction of RCC ESR at Nagoan Cap 1.25 ML | 1,30,55,721.00 |
| 25 | Construction of RCC ESR at Old Temghar Cap 0.50 ML | 59,67,216.15 |
| 26 | Pusuing of M.S. pipe line for N.H. Crossing | 73,50,379.05 |
| | | |
| | **Zone-II BMC Tapping 40.00 MLD** | |
| 27 | Providing, lowering, laying and jointing 700 mm dia line for Raw water gravity main from BMC Tapping to W.T.P. at Temghar | 3,44,02,667.25 |
| 28 | Construction of Water Treatment Plant Capacity 43.00 MLD conventional type at Temghar in Campus of existing Water Treatment Plant | 8,99,98,657.35 |
| 29 | Recirculation of water at W.T.P. Temghar Cap 43.00 MLD | 1,03,35,624.00 |
| 30 | Providing, installing and commissioning pure water pumping machinery at Water Treatment Plant at Temghar | 3,41,91,216.15 |
| 31 | Providing, lowering, laying and joining 900 mm dia (I.D.) M.S. Pipe line for pure water rising main from W.T.P. at Temghar to ESR at Phene-Phulenagar | 8,64,89,262.30 |
| 32 | Providing, Lowering, laying and jointing 600mm to 300mm dia D.I.K.-7 pipe line for Zonal liding main in city BMC source | 2,63,73,050.55 |
| 33 | Providing, lowering, laying and joining 350mm dia D.I.K. 9 pipe line from Bhiwandi GSR pure water rising main to new Temghar ESR | 11,57,753.10 |
| 34 | Construction of ESR at Padmanagar (Telgu School Compound) Cap 1.50 ML | 1,58,01,934.05 |
| 35 | Construction of GSR 1.0 ML at Varhale Devi, Varhale | 53,37,671.85 |
| 36 | Construction of ESR at Varhale Cap 0.50 ML | 85,90,860.60 |
| 37 | Construction of GSR at Neharu Nagar 2.30 ML | 86,09,942.25 |
| | | |
| | ZONE-III Stem Source 73.00 ML | |
| 38 | Providing, lowering laying and jointing 900mm to 250MM dia D.I. K-7 pipe for zonal leading main of city STEM source. | 18,03,20,449.05 |
| 39 | Construction of RCC Sump at Sathenagar Capacity 1,80,000 Liters | 21,50,925.00 |
| 40 | Providing, installing, and commissioning pure water pumping machinery at sathe nagar Sump. | 35,64,198.75 |
| 41 | Construction of RCC ESR at Stadium capacity 1.10 ml. | 1,42,22,855.85 |
| 42 | Construction of RCC ESR at Sathenagar Capacity 1.60 ml. | 1,55,47,083.30 |
| 43 | Construction of overhead Pump House at sathenagar | 7,11,238.50 |
| 44 | Providing, lowering, laying and jointing pure water rising main 350 mm dia D.I. K-9 Pipe line from sump ESR at satheNagar. | 10,66,151.10 |
| 45 | Construction of RCC ESR at 72 Gala-2 Nos. Cap. 1.30 ml each. | 3,34,31,052.90 |
| 46 | Automation for Bhiwandi Nizampur WSS | 4,50,10,560.00 |
| 47 | Dismantling of 90 MLD existing WTP at Sonale | 1,14,15,713.40 |
| | PROVISIONS | |
| 48 | M.S.E.D.CO. –Deposit and connection charges WTP-2 Nos. Head work, sump and Pump House-2 Nos. | 3,00,00,000.00 |
| 49 | Road Crossing charges- National Highway, State Highway. | 90,00,000.00 |
| 50 | Other Miscellaneous Works/Cross Connection | 25,00,000.00 |
| | **Total Amount Rs.** | **20,55,21,1876.70** |
| | **Say Rs.** | **205.52 कोटी** |
| प्रकल्प पूर्ण करण्याचा कालावधी | | कार्यादेश दिनांकापासून २७ महिने |

**०३.** भिवंडी-निजामपूर शहर पाणी पुरवठा योजनेचा केंद्र शासनाकडून मंजूर राज्य वार्षिक कृति आराखडयानुसार वित्तीय आकृतिबंध पुढीलप्रमाणे आहे.

| अ. क्र. | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव | योजनेची मंजूर किंमत (डीपीआर नुसार) | केंद्र शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या ५०%) | राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या २५%) | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा सहभाग (प्रकल्प किंमतीच्या २५%) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | भिवंडी-निजामपूर महानगर पालिका | रु. २०५.५२ कोटी | रु. १०२.७६ कोटी | रु. ५१.३८ कोटी | रु. २१.३८ कोटी |

०४. संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयानुसार भिवंडी-निजामपूरशहर पाणी पुरवठा प्रकल्पास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे :-

४.१ सदर प्रकल्पासाठी कार्यान्वयन यंत्रणा भिवंडी-निजामपूर **महानगरपालिका** राहील.

४.२ केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचना व राज्य शासनाच्या संदर्भाधीन शासन निर्णयानुसार सदर प्रकल्पाची अंमलबजावणी करणे कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.

४.३ राज्य शासनाने शासन परिपत्रक क्रमांक अमृत -२०१६/प्र.क्र. १६३/नवि-३३, दिनांक १६ मे, २०१६ नुसार विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार सदर प्रकल्पाची निविदा प्रक्रिया व अंमलबजावणी विहित कालावधीमध्ये पूर्ण करणे संबंधित कार्यान्वयन यंत्रणेवर बंधनकारक राहील. सदर प्रकल्पामध्ये समाविष्ट डी.आय. पाईप्स व अन्य पाईप्सचाही समावेश सदर निविदेमध्ये करावा.

४.४ सदर प्रकल्पाच्या निविदा या महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने अमृत अभियानातील पाणीपुरवठा प्रकल्पांसाठी निर्गमित केलेल्या नमुना निविदा प्रपत्रानुसार करणे कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.

४.५ सदर प्रकल्पाच्या कामाचे कार्यादेश प्रशासकीय मंजूरीच्या आदेशापासून ४५ दिवसांच्या आत देण्यात येतील याची कार्यान्वयन यंत्रणेने दक्षता घ्यावी.

४.६ राज्यस्तरीय उच्चाधिकार समितीच्या बैठकीतील इतिवृत्तामध्ये नमूद करण्यात आलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित अभियान शहरांना व कार्यान्वयन यंत्रणांना बंधनकारक राहील.

४.७ केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानांतर्गत केंद्र शासनाने विहित केलेल्या सुधारणांची (Reforms) पूर्तता विहित कालावधीत पूर्ण करणे संबंधित अभियान शहरास बंधनकारक राहील.

४.८ निधी वितरणाची कार्यपद्धती: केद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार केंद्र शासन हिश्याचा निधी हा तीन टप्यात (२०टक्के + ४०टक्के + ४०टक्के) वितरीत

केला जाणार आहे. त्यानुसार केंद्र शासनाकडून वितरीत निधीच्या प्रमाणात राज्य हिश्याचा निधी केंद्र हिस्सा वितरीत करताना सोबत वितरीत केला जाईल.

४.९ सदर प्रकल्पासाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिश्याचा प्रथम हप्त्याचा निधी सदर प्रकल्पाचे कार्यादेश दिल्यानंतर महानगरपालिकेस वितरीत करण्यात येईल. त्यानुसार केंद्र शासनाने विहित केल्यानुसार उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास सादर केलेनंतर पुढील हप्त्याचा केंद्र हिश्याचा व त्याप्रमाणत राज्य हिश्याचा निधी वितरीत करण्यात येईल.

४.१० अमृत अभियानांतर्गत मंजूर प्रकल्पासाठी स्वहिश्याचा निधी उभारताना नागरी स्थानिक स्वराज संस्थांनी त्यांना प्राप्त होणाऱ्या १४ व्या वित्त आयोगाच्या निधीशी एककेंद्राभिमुख (Convergence) करणे आवश्यक राहील.यासाठी त्यांनी १४ वा वित्त आयोगातून मिळणारा निधी चिन्हांकीत करून ठेवावा.

४.११ अभियानाच्या वित्तिय आकृतीबंधानुसार केंद्र व राज्य शासनाने वितरीत केलेल्या निधीच्या प्रमाणात नागरी स्थानिक स्वराज संस्था हिश्याचा निधी उभा करून सदर खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनाने विहित केलेल्या प्रपत्रात शासनास सादर करणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज संस्थेवर बंधनकारक असणार आहे.

४.१२ सदर प्रकल्पासाठी निधी वितरीत करताना दिलेल्या सूचनांनुसार, सदर प्रकल्पासाठी प्राप्त निधी शासनाच्या प्रचलित धोरणानुसार विहीत केलेल्या बँकांमध्ये, स्वतंत्र खाते उघडून ठेवणे अनिवार्य राहील. सदर प्रकल्पासाठी वितरीत केलेला निधी त्याच प्रकल्पासाठी वापरणे बंधनकारक असून त्याचा वापर इतर प्रयोजनार्थ केल्यास सदर बाब ही गंभीर वित्तिय अनियमितता समजण्यात येईल.

४.१३ राज्य शासनामार्फत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेसाठी प्रकल्प मंजूर झाल्यानंतर, मूळ प्रकल्प किंमतीमध्ये कोणत्याही कारणास्तव वाढ झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित कार्यान्वयन यंत्रणेची राहील. राज्य शासनामार्फत त्या करिता कोणतेही वाढीव अनुदान उपलब्ध केले जाणार नाही.

४.१४ सदर प्रकल्पाची अंमलबजावणी विहित कालावधीत पूर्ण करण्याची सर्वस्वी जबाबदारी ही संबंधित कार्यान्वयन यंत्रणेची राहील.

४.१५ प्रकल्पाचे काम सुरु झालेनंतर प्रकल्प व्यवस्थापक सल्लागाराने कामाची गुणवत्ता व देयके प्रमाणित केलेनंतर उपलब्ध निधीच्या मर्यादेत कामाची देयके १५ दिवसांत संबंधित कंत्राटदारास देण्याची जबाबदारी संबंधित कार्यान्वयन यंत्रणेची राहील.

४.१६ अमृत अभियानाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार सदर प्रकल्पासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापक सल्लागार म्हणून कार्य करील. त्यापोटी कार्यान्वयन यंत्रणा ३ टक्के इतके शुल्क शासनामार्फत विहीत करण्यात येणाऱ्या कार्यपध्दतीनुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास अदा करेल. तसा ठराव महानगरपालिकेने करणे बंधनकारक राहील.

४.१७ या प्रकल्पाच्या सविस्तर प्रकल्प अहवालात नमूद केल्याप्रमाणे प्रकल्प आर्थिकदृष्ट्या शाश्वत होण्यासाठी पाणीपट्टीची आकारणी करण्याबाबत स्थानिक स्वराज्य संस्थेने ठराव करणे बंधनकारक राहील.

४.१८ प्रकल्पाचे कार्यादेश देण्यापूर्वी महामार्ग ओलांडण्यासाठी (Highway Crossing) आवश्यक ना हरकत प्रमाणपत्र मिळविण्याची कार्यवाही करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०२०८१६४९२५९५२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pandurang Jotiba Jadhav

Digitally signed by Pandurang Jotiba Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=Pandurang Jotiba Jadhav
Date: 2017.02.09 13:13:12 +05'30'

**( पां.जो.जाधव )**

**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा .मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
३. मा.राज्यमंत्री नगरविकास विभाग यांचे खाजगी सचिव
४. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक
५. अप्पर मुख्य सचिव,नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक
६. प्रधान सचिव,पाणीपुरवठा विभाग यांचे स्वीय सहायक
७. प्रधान सचिव,नगरविकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक
८. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई.
९. आयुक्त तथा संचालक ,नगरपरिषद प्रशासन संचालनालय ,मुंबई.
१०. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, बेलापूर सी.बी.डी, नवी मुंबई.
११. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र नागरी विकास अभियान संचालनालय, मुंबई.
१२. जिल्हाधिकारी, ठाणे
१३. जिल्हा प्रशासन अधिकारी, ठाणे
१४. अधिक्षक अभियंता, मध्यवर्ती नियोजन संकल्पचित्र व सनियंत्रण, मजीप्रा, कोपरी, ठाणे.
१५. आयुक्त, भिवंडी-निजामपूर महानगरपालिका, भिवंडी, जि. ठाणे
१६. निवडनस्ती, नवि-३३.